**पोलीस आयुक्त, मुंबई यांच्या आस्थापनेवरील गुन्हे अन्वेषण विभागाच्या गुन्हे शाखा येथे कार्यरत विशेष कार्य पथकातील कार्यरत पोलीस अधिकारी/ कर्मचारी यांना ७ व्या वेतन आयोगानुसार प्रोत्साहन (जोखीम) भत्ता मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एमआयएस-०७२०/प्र.क्र.१२४/विशा-४,**
दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुख्य इमारत, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २१ ऑक्टोबर, २०२०.

वाचा-: १. गृह विभाग, शासन निर्णय क्र.एपीओ-२६८९/९१२३/प्र.क्र.१३/पोल-३, दिनांक ११.०७.१९८९
२. गृह विभाग, शासन निर्णय क्र.एपीओ-२६८९/९१२३/प्र.क्र.१३/पोल-३, दिनांक २८०.९.१९९०
३. गृह विभाग, शासन निर्णय क्र.एमआयएस-०६९०/१२०५/प्र.क्र.१९३/पोल-३, दिनांक २१.०६.१९९१.
४. गृह विभाग, शासन निर्णय क्र.एमआयएस-१०१.क्र.प्र/०१३१/विशा-४, दिनांक ०३.०९.२०११
५. सह पोलीस आयुक्त (प्रशासन), पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे कार्यालय, मुंबई यांचे दिनांक ०४.०५.२०२० चे पत्र सहपत्रांसह.

**प्रस्तावना-:**

बृहन्मुंबईतील संघटीत गुन्हेगारांच्या कारवायांना परिणामकारकरित्या आळा घालण्यासाठी बृहन्मुंबई पोलीस दलातील गुन्हा अन्वेषण विभागाच्या गुन्हे शाखेमध्ये एक विशेष कार्य पथक (Special Operation Squad) निर्माण करुन त्याला आवश्यक ती आधुनिक शस्त्रे व अन्य सामुग्री पुरविण्याचा निर्णय शासनाने घेतला होता. त्यानुसार संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवरील गुन्हे अन्वेषण विभागाच्या गुन्हे शाखा येथे विशेष कार्य पथकाची निर्मिती करण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र.१, संदर्भ क्र.२ व संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये विशेष कार्य पथकासाठी एकूण २० पोलीस अधिकारी आणि ३३ पोलीस अंमलदार अशी एकूण ५३ पदे मंजूर करण्यात आली आहेत. तसेच संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयानुसार विशेष कार्य पथकातील कार्यरत पोलीस अधिकारी/ कर्मचारी यांना धोक्याच्या व जिकरीच्या कामावर जाण्यास प्रोत्साहन म्हणून घरभाडे व स्थानिक पूरक भत्ता वगळून इतर सर्व पगार व भत्ते यांच्या ५० टक्के जादा वेतन व चालक कर्मचारी प्रोत्साहन म्हणून घरभाडे व स्थानिक पूरक भत्ता वगळून इतर सर्व पगार व भत्ते यांच्या ३० टक्के जादा वेतन प्रोत्साहन (जोखीम) भत्ता देण्याबाबत निर्णय घेण्यात आला होता.

सदर पथकामध्ये अत्यंत जोखिमेचे कामकाज असल्यामुळे पोलीस दलातील अधिकारी / कर्मचारी हे विशेष कार्य पथकामध्ये येण्यास इच्छुक होण्याच्या अनुषंगाने त्यांना प्रोत्साहन भत्ता देणे क्रमप्राप्त आहे. ६ व्या वेतन आयोगामध्ये Basic + Grade Pay बेरजेवर प्रोत्साहन भत्ता देण्यात येत होता. तथापि, ७ व्या वेतन आयोगामध्ये Grade pay ही संकल्पना संपुष्टात आलेली आहे. त्यामुळे विशेष कार्य पथकातील पोलीस अधिकारी/ कर्मचारी यांना ७ व्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार प्रोत्साहन भत्ता मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

विशेष कार्य पथकातील कार्यरत पोलीस अधिकारी/कर्मचारी यांना ७ व्या वेतन आयोगाच्या मूळ वेतनाच्या २५% इतका व पोलीस चालक कर्मचारी यांना ७ व्या वेतन आयोगाच्या मूळ वेतनाच्या १५% इतका प्रोत्साहन भत्ता मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे. विशेष कार्य पथकातील अधिकारी/कर्मचारी यांची माहिती सोबतच्या विवरणपत्रात नमूद करण्यात आली आहे. (सहपत्र अ व ब)

विशेष कार्य पथकातील कार्यरत पोलीस अधिकारी/कर्मचारी यांना ७ व्या वेतन आयोगानुसार लागू करावयाच्या प्रोत्साहन भत्त्याबाबत खालीलप्रमाणे सूत्र अवलंबिण्यात यावे.

<u>विशेष सुरक्षा घटक, विशेष कार्य पथक</u>

अ. विशेष कार्य पथकामध्ये कार्यरत पोलिस अधिकारी/ कर्मचारी यांना अदा करावयाच्या प्रोत्साहन भत्त्याचे सूत्र:-

**सातव्या वेतन आयोगानुसार मिळणारे मूळ वेतन X ०.२५ = सातव्या वेतन आयोगामधील प्रोत्साहन (जोखीम) भत्ता.**

आ. विशेष कार्य पथकामध्ये कार्यरत चालक कर्मचारी यांना अदा करावयाच्या प्रोत्साहन भत्त्याचे सूत्र:-

**सातव्या वेतन आयोगानुसार मिळणारे मूळ वेतन X ०.१५ = सातव्या वेतन आयोगामधील प्रोत्साहन (जोखीम) भत्ता.**

२. सदर प्रोत्साहन भत्ता हा ७ वा वेतन आयोग लागू झाल्याच्या दिनांकापासून पूर्वलक्षी प्रभावाने लागू होईल.

३. सदर प्रोत्साहन भत्त्यावर इतर कोणतेही भत्ते अनुज्ञेय राहणार नाहीत. विशेष कार्य पथकातील पोलीस अधिकारी/कर्मचारी हे मुळ घटकात परत गेल्यास त्यांना हा प्रोत्साहन भत्ता देय होणार नाही.

४. सदर भत्त्यापोटी येणारा खर्च संबंधित पदाचे वेतन व भत्ते ज्या लेखाशिर्षाखाली टाकण्यात येतात त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३२४/२०२०/व्यय-७, दिनांक ०१ ऑक्टोबर, २०२० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२०१०२११३२८३९५७२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Babasaheb Sadashiv Khandare

Digitally signed by Babasaheb Sadashiv Khandare
DN: CN = Babasaheb Sadashiv Khandare, C = IN, S = Maharashtra, O = Government of maharashtra, OU = Home Department
Date: 2020.10.21 13:36:42 +05'30'

**( बाबासाहेब स. खंदारे )**
कक्ष अधिकारी, गृह विभाग

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
२. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
३. मा.सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव.

४. मा.अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव.
५. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद यांचे खाजगी सचिव.
६. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा यांचे खाजगी सचिव.
७. मा. मा.मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव.
८. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव.
९. मा.राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
१०. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११. अपर मुख्य सचिव (गृह), मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३. पोलीस आयुक्त, मुंबई.
१४. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१५. अपर पोलीस महासंचालक(का.व.सु.), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र/नागपूर.
१७. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र/ नागपूर.
१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर
१९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई/नागपूर.
२०. संबंधित कोषागार अधिकारी.
२१. कक्ष अधिकारी (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२२. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२३. निवडनस्ती/ विशा-४, गृह विभाग.

**सहपत्र -अ**

## विशेष कार्य पथकातील मंजूर व कार्यरत अधिकारी /कर्मचारी पदांची माहिती

| अ.क्र. | पदनाम | मंजूर पदे | कार्यरत पदे |
|---|---|---|---|
| १ | पोलीस निरीक्षक | ०५ | ०१ |
| २ | पोलीस उप निरीक्षक | १५ | ०४ |
| ३ | पोलीस हवालदार | ०५ | ०४ |
| ४ | पोलीस शिपाई | २० | १७ |
| ५ | पोलीस शिपाई चालक | ०८ | ०६ |
| **एकूण** | | **५३** | **३२** |

**सहपत्र -ब**

## विशेष कार्य पथकातील अधिकारी /कर्मचारी यांच्या वेतनश्रेणीची माहिती

| अ.क्र. | पदनाम | ७ व्या वेतनआयोगानुसार वेतनश्रेणी |
|---|---|---|
| १ | पोलीस निरीक्षक | एस-१८- ४९,१००-१,५५,८०० |
| २ | पोलीस उप निरीक्षक | एस-१४- ३८,६००-१,२२,८०० |
| ३ | पोलीस हवालदार | एस-९- २६,४००-८३,६०० |
| ४ | पोलीस शिपाई | एस-७- २१,७००-६९,१०० |
| ५ | पोलीस शिपाई चालक | एस-७- २१,७००-६९,१०० |

Babasaheb Sadashiv Khandare

Digitally signed by Babasaheb Sadashiv Khandare
DN: CN = Babasaheb Sadashiv Khandare, C = IN, S = Maharashtra, O = Government of maharashtra, OU = Home Department
Date: 2020.10.21 13:37:08 +05'30'

**( बाबासाहेब स. खंदारे )**
कक्ष अधिकारी, गृह विभाग